**पुरवठा शाखेतील पुरवठा निरीक्षकांची आणि वित्तीय सल्लागार व उप सचिव यांच्या कार्यालयातील उच्चस्तर लिपिकांची सरळसेवेची रिक्त पदे भरण्याची प्रक्रिया राबविण्यासाठी आय.बी.पी.एस. कंपनीची निवड करणेबाबत तसेच समन्वय अधिकारी यांची नेमणूक करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ससेनि- १३२२/प्र.क्र.६३/ना.पु.१५,**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १७ मे, २०२३.

**वाचा :-** १. शासन निर्णय, अ.ना.पु. व ग्रा. सं. वि. क्र. संकीर्ण- १०१७/प्र.क्र.१५६/ना.पु.१२ दि. १८.०४.२०२२.
२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. प्रनिमं १२१६/(प्र.क्र.६५/१६)/१३ अ, दि. ०४.०५.२०२२.
३. शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि- २०२२/प्र.क्र.२/२०२२/आ. पु.क. दि. ३१.१०.२०२२.
४. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. प्रनिमं १२२२/प्र.क्र.१३६/का.१३-अ, दि.२१.११.२०२२.

**प्रस्तावना :-**

शासन निर्णय, वित्त विभाग दि.३१.१०.२०२२ अन्वये पदभरतीवरील निर्बंधामध्ये शिथिलता देऊन ज्या विभागांचा सुधारित आकृतीबंध अंतिम झालेला आहे अशा विभागातील सरळसेवेच्या कोट्यातील रिक्त पदे १०० टक्के भरण्यास मान्यता देण्यात आली आहे. तद्नुषंगाने उच्चस्तर सचिव समितीच्या मान्यतेने या विभागाच्या शासन निर्णय दि.१८.४.२०२२ अन्वये अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालयातील पदांचा आढाव्याअंती सुधारित आकृतीबंध निश्चित करण्यात आला आहे.

सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२१.११.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळाच्या कक्षेतील (महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेबाहेरील) गट-ब (अराजपत्रित), गट-क व गट-ड संवर्गातील सरळसेवेच्या कोट्यातील पदे सरळसेवेने भरताना यापुढे स्पर्धा परिक्षा टी.सी.एस., आय.ओ.एन व आय. बी. पी. एस. या कंपनीमार्फत ऑनलाईन पध्दतीने घेण्यास मान्यता देण्यात आली आहे.

त्यानुसार पुरवठा शाखेतील पुरवठा निरीक्षकांची आणि वित्तीय सल्लागार व उप सचिव यांच्या कार्यालयाच्या अधिपत्याखालील उच्चस्तर लिपिकांची सरळसेवेची रिक्त पदे भरण्याची प्रक्रिया आय.बी.पी.एस. कंपनीमार्फत राबविण्याची तसेच भरती प्रक्रिया राबविण्याकरीता समन्वय अधिकारी यांची नेमणूक करणेबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेत नमुद केलेली वस्तुस्थिती विचारात घेऊन, सामान्य प्रशासन विभागाच्या दि.०४.०५.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या निर्देशानुसार अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाच्या अधिपत्याखालील पुरवठा शाखेतील पुरवठा निरीक्षकांची आणि वित्तीय सल्लागार व उप सचिव यांच्या कार्यालयातील उच्चस्तर लिपिकांची सरळसेवेची रिक्त पदे स्पर्धा परिक्षेच्या माध्यमातून भरण्यात येणार असून, सदर भरती प्रक्रिया राबविण्यासाठी आय.बी.पी.एस. कंपनीची निवड करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. विभागीय आयुक्त यांच्या अधिनस्त पुरवठा शाखेतील पुरवठा निरीक्षक हे पद विभागीय सवर्ग पद आहे. पदभरतीमध्ये एकसुत्रता राहणे आवश्यक असल्याने सदर पदाची भरती प्रक्रिया केंद्रीय पध्दतीने करण्यात यावी.

३. तसेच, पुरवठा निरीक्षक आणि उच्चस्तर लिपिकांची सरळसेवेची रिक्त पदे स्पर्धा परिक्षेच्या माध्यमातून भरण्याच्या अनुषंगाने भरती प्रक्रिया राबविण्यासाठी, समन्वय व अनुषंगीक आवश्यक कार्यवाही करण्यासाठी खालील समन्वय अधिकारी यांची नेमणूक करण्यात येत आहे.

| अ.क्र. | भरती प्रक्रिया राबविण्यात येणा-या पदाचे नाव | संबंधित समन्वय अधिकारी |
|---|---|---|
| १. | पुरवठा निरीक्षक | उप आयुक्त (पुरवठा), कोकण विभाग, नवी मुंबई. |
| २. | उच्चस्तर लिपिक | वित्तीय सल्लागार व उप सचिव. |

४. सदर भरती प्रक्रिया राबविण्याच्या अनुषंगाने शासनाच्या वतीने आय.बी.पी.एस. कंपनीसोबत सामंजस्य करारनामा (MOU) करण्यासाठी उप आयुक्त (पुरवठा), कोकण विभाग, नवी मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

५. परीक्षा शुल्काची रक्कम डेबिट कार्ड (RuPay/Visa/Master Card/Maestro ), क्रेडिट कार्ड, इंटरनेट बँकिंग, IMPS, कॅश कार्ड्स (cash cards) / मोबाइल वॉलेट वापरून भरली जाणार आहे. यास्तव सदरची रक्कम या विभागाचे आहरण व सवितरण अधिकारी यांचे चालू खाते क्र. ६०३५५६००३४८, बँक ऑफ महाराष्ट्र, मंत्रालय, मुंबई शाखा यामध्ये जमा करण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२३०५१७१६२६५६०९०६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TATOBA MARUTI KOLEKAR

Digitally signed by TATOBA MARUTI KOLEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=f6809ddecc0e0507860e37e9935ab3a7013510f4fe04fad27512588a0bc8e15f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9915405908628D01955F3675ACC122F51E0C39F63F7CC88EEC49CD05616991FD, cn=TATOBA MARUTI KOLEKAR
Date: 2023.05.17 16:27:17 +05'30'

**(ता. मा. कोळेकर)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रती,**

१) सर्व विभागीय आयुक्त.
२) खाजगी सचिव, मा. मंत्री (अ.ना.पु.व ग्रा.सं.वि.) यांचे कार्यालय.

३) सचिव (अ.ना.पु.व ग्रा.सं.वि.) यांचे स्वीय सहायक.

४) वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.

५) सर्व उप आयुक्त (पुरवठा).

६) अवर सचिव/ कक्ष अधिकारी(ना.पु.१२, संगणक कक्ष व रोख शाखा).

७) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी/ अन्नधान्य वितरण अधिकारी .

८) मुख्य सहयोगी (Associate Head) आय.बी.पी.एस. (ईमेल cr२@ibps.in) आय.बी.पी.एस.हाऊस, ९० फिट, डी.पी.रोड, ठाकुर पॉलिटेक्निकच्या मागे, ठाकुर कॉम्पेक्स, वेस्टर्न एक्सप्रेस हायवेच्या समोर, कांदिवली (पुर्व), मुंबई- ४०० १०१.

९) निवडनस्ती ना.पु.१५.